**महाराष्ट्र इमारत व इतर बांधकाम कामगार कल्याणकारी मंडळांतर्गत मान्यता प्राप्त सहायक कामगार आयुक्त आणि सरकारी कामगार अधिकारी या पदांच्या नावात बदल करणेबाबत**

**महाराष्ट्र शासन**
**उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग**
**शासन निर्णय क्र.इमारत २०१४/प्र.क्र.१५७/कामगार-७**
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक : ०४ ऑक्टोबर, २०१८

<u>वाचा</u> :- १) शासन निर्णय उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग क्रमांक इमारत २०१२/ प्र.क्र.१६१ / कामगार ७अ, दि.३.१०.२०१२

## प्रस्तावना :-

महाराष्ट्र इमारत व इतर बांधकाम कामगार कल्याणकारी मंडळाच्या मुख्यालयाकरिता सहायक कामगार आयुक्त व सरकारी कामगार अधिकारी असे प्रत्येकी १ पदास व जिल्हा स्तरावरील कार्यालयांकरिता व सरकारी कामगार अधिकाऱ्यांच्या १९ पदांना दिनांक ३.१०.२०१२ च्या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात आलेली आहे. तथापि महाराष्ट्र इमारत व इतर बांधकाम कामगार कल्याणकारी मंडळ हे स्वायत्त असल्याने सहायक कामगार आयुक्त व सरकारी कामगार अधिकारी या पदाच्या नावामध्ये बदल करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय :-

महाराष्ट्र इमारत व इतर बांधकाम कामगार कल्याणकारी मंडळाच्या दिनांक ३.१०.२०१२ च्या शासन निर्णयान्वये मान्यता दिलेल्या सहायक कामगार आयुक्त व सरकारी कामगार अधिकारी या पदांना अनुक्रमे“जिल्हा कार्यकारी अधिकारी (महाराष्ट्र इमारत व इतर बांधकाम कामगार कल्याणकारी मंडळ)” व उप कार्यकारी अधिकारी (महाराष्ट्र इमारत व इतर बांधकाम कामगार कल्याणकारी मंडळ)”असे संबोधण्यात यावे.

२. सदरचा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध असून ,त्याचा संगणक संकेतांक २०१८१००४१४५५२१५९१० असा आहे .तसेच सदर शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Dattatray Yashavant Dange

Digitally signed by Dattatray Yashavant Dange
DN: CN = Dattatray Yashavant Dange, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Industry Energy and Labour Department
Date: 2018.10.04 15:02:14 +05'30'

**( द. य. डांगे )**
कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१. मा.राज्यपाल यांचे प्रधान सचिव.
२. मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई.
३. मा.मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मुख्यमंत्री सचिवालय, मंत्रालय, मुंबई
४. मा.विरोधी पक्ष नेता, विधानसभा/विधानपरिषद यांचे खाजगी सचिव.
५. मा.मंत्री (कामगार) यांचे खाजगी सचिव
६. मा.राज्यमंत्री (कामगार) यांचे खाजगी सचिव
७. अध्यक्ष, महाराष्ट्र इमारत व इतर बांधकाम कामगार कल्याणकारी मंडळ, मुंबई.
८. सर्व अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव / सचिव, मंत्रालयीन विभाग.
९. महालेखापाल, महाराष्ट्र १/२, मुंबई / नागपूर
१०.अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
११.निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई.
१२.सर्व विभागीय आयुक्त.
१३.सर्व मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग
१४.सर्व मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग
१५.कामगार आयुक्त,कामगार भवन, बांद्रा-कुर्ला संकुल, बांद्रा (पूर्व), मुंबई- ५१.
१६.सचिव तथा मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र इमारत व इतर बांधकाम कामगार कल्याणकारी मंडळ, मुंबई.
१७.सर्व महानगरपालिका/नगरपालिका आयुक्त
१८. सर्व जिल्हाधिकारी
१९.सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद
२०.सर्व गटविकास अधिकारी, पंचायत समिती
२१.सर्व मुख्याधिकारी, नगर परिषद
२२.सर्व नोंदणी अधिकारी

२३.कामगार आयुक्त यांच्या आस्थापनेवरील सर्व क्षेत्रीय अधिकारी (द्वारा कामगार आयुक्त)
२४.सर्व अधिकारी (कामगार प्रभाग), उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई.
२५.प्रधान सचिव (कामगार) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
२६.उप सचिव (कामगार-७),यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
२७. निवडनस्ती (कामगार ७)